एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम - ५ व ६
**राज्यसेवा (मुख्य) परिक्षा - २०१७ व २०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या गट-अ व गट-ब संवर्गातील उमेदवारांच्या परिवीक्षाधीन प्रशिक्षण कालावधी करिता निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टिआरएन-२०२०/५९/प्र.क्र.१७/उद्योग-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०३ मार्च, २०२२

वाचा:-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४
२) शासन निर्णय, उ.ऊ.व का. विभाग क्रमांक इएसटी २०१५/३९८/प्र.क्र.११०/उद्योग-३, दिनांक ७.१०.२०१५
३) शासन निर्णय, उ.ऊ.व का.विभाग क्र.टिआरएन-२०२०/५९/प्र.क्र.१६/उ-३, दि.२४.१.२०२०
४) या विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दि.२४.०१.२०२०
५) सामान्य प्रशासन विभाग पत्र क्र.टिआरएन-०९२१/प्र.क्र.२३/सीपीटीपी-अ, दि.११.१०.२०२१

प्रस्तावना:-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणाऱ्याया गट-अ मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षांच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्याअनुषंगाने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील उद्योग संचालनालयातंर्गत उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट अ व उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट ब संवर्गाचा समावेश संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये करण्यास मान्यता देण्यात आली आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परीक्षा -२०१७ व २०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम -५ व ६ मध्ये प्रशिक्षण घेणाऱ्या उमेदवारांसाठी संदर्भ क्रमांक ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये दि.३०.९.२०१९ ते दि.०३.१०.२०२१ या दोन वर्षाच्या कालावधीसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली होती. तथापि, सदर परिविक्षाधीन अधिकाऱ्यांची ज्येष्ठता निश्चित करुन सेवाज्येष्ठतेनुसार संवर्गवाटप हाईपर्यंत काही कालावधी लागणार असल्यामुळे सदर पदांना मुदतवाढ देण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये या विभागास कळविले आहे. यास्तव, सदर पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासनाच्या वाचा क्र.३ व ४ येथील शासन निर्णयान्वये उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या अनुक्रमे उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट-ब या संवर्गातील ७ तर उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट अ संवर्गातील २ अधिसंख्य पदांना दि.०४.१०.२०२१ ते दि.०३.०३.२०२२ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९१/आपुक, दि.१५.०२.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या आधारे निर्गमित करण्यात येत आहे.

३ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०३१७३६१७०८१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra V Gurav

Digitally signed by Ravindra V Gurav
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY, LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, pseudonym=B67CC3974B29D17A658E4CE714FCD068FD7E189B, serialNumber=9DFB7AEFBD9E82B129C324D567B46E1D853D93C38D6E222C868EAC72ECD12784, cn=Ravindra V Gurav
Date: 2022.03.03 17:39:49 +05'30'

**(रविंद्र गुरव)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
५. अ.मु.स. (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई
७. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
८. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर - ४४२ ४१०.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. उप सचिव (सीपीटीपी-अ व ब) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. उप सचिव ( प्रशा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. उप सचिव (व्यय-१६ / आपुक/ वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. आस्थापना अधिकारी, उद्योग संचालनालय, मंत्रालयासमोर, मुंबई (आवश्यक कार्यवाहीकरिता)
१४. जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे.
१४.निवडनस्ती.